58/A./ 83

होमगार्डसना गणवेष व इतर वस्तु पुरविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग (विशेष)**

**शासन निर्णय क्र.: एचजीएस २००२/प्र.क्र.१०७/विशा.८,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १८ फेब्रुवारी, २००५**

**वाचा :-** महासमादेशक, होमगार्ड महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मस-०३/२००४/५९९८, दिनांक २०.१२.२००४.

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाच्या सारसंग्रहानुसार प्रत्येक पुरुष व महिला होमगार्ड सदस्यांना गणवेष विहित करण्यात आलेला आहे. त्यानुसार राज्य होमगार्ड संघटनेतील मानसेवी होमगार्डसना गणवेष पुरविणे आवश्यक आहे. तथापि दरवर्षी पुरेसे अनुदान उपलब्ध झाले नसल्याने दरवर्षी फक्त १० ते १५% गणवेष साहित्य खरेदी करणे शक्य झाले आहे. त्यामुळे पुरेश्या गणवेषाअभावी पोलीस दलाच्या मागणीनुसार कायदा व सुव्यवस्था बंदोबस्त कर्तव्यासाठी होमगार्ड पुरविणे शक्य होत नाही. तसेच गणवेषा अभावी प्रशिक्षणार्थी होमगार्डसची प्रशिक्षण शिबीरे पार पाडता येत नाहीत. त्यामुळे सर्व होमगार्डसना गणवेषाचा पुरवठा करणे आवश्यक आहे. प्रत्येक होमगार्डला गणवेष पुरविणे शक्य व्हावे म्हणून एकूण रु.२,६८,१७,०००/- रकमेची आवश्यकता असुन त्यापैकी पहिल्या टप्प्यान्वये रु. २५,००,०००/- इतकी रक्कम गणवेषाकरिता सन २००२-०३ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजुर केली आहे. त्यामुळे दुसऱ्या टप्प्यान्वये रु.२,४३,१७,०००/- इतके अनुदान गणवेष खरेदी करण्याकरिता मंजुर करण्याचा प्रस्ताव शासनाने मान्य केलेला आहे. त्यानुसार होमगार्डसना गणवेष वस्तु व गणवेष विहित पध्दतीने खरेदी करुन पुरविण्याकरिता सन २००४-०५ मध्ये पुरक मागणीद्वारे उपलब्ध करुन दिले असून सदर खर्चास दिनांक ५.११.२००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय** :- महाराष्ट्र राज्य होमगार्ड संघटनेसाठी सन २००४-०५ मध्ये सामुग्री व पुरवठा या उपशिर्षाखाली नियमित तरतुद रु.६०.०० लाख व मार्च, २००४ च्या अधिवेशनात पुरक मागणीद्वारे रु.२,४३,१७,०००/- इतके मिळून रु.३,०३,१७,०००/- इतके अनुदान मंजुर झाले आहे. सदर रु.३,०३,१७,०००/- अनुदानापैकी महाराष्ट्र राज्य होमगार्डना गणवेष खरेदी व त्यानुषंगाने आवश्यक असलेल्या इतर वस्तु खरेदीसाठी रु.१,८७,०६,१७३/- (रुपये एक कोटी, सत्त्यांऐंशी लाख, सहा हजार, एकशे त्र्याहत्तर फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास शासन मंजुरी देत आहे.

३. सदर रक्कम वित्त विभागाने ५०% तरतुद वितरीत करण्याबाबतचे आदेश शिथील करुन खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर खरेदी शासनाच्या खरेदी बाबतच्या प्रचलित नियमानुसार करण्यात यावी.

५. हा खर्च मागणी क्र. बी-१ "२०७०-इतर प्रशासनिक सेवा-१०७-होमगार्ड-३३-सामुग्री व पुरवठा (२०७० ०२८१)" या लेखाशिर्षाखाली दर्शवावा व तो सन २००४-०५ च्या आर्थिक वर्षात मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

58/A:/ 83

६. हा निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांच्या अनौ. संदर्भ क्रमांक: सीआर-६५/२००५ व्यय-८, दिनांक ५.२.२००५ व ६४७/अर्थोपाय, दिनांक १६.२.२००५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( क. गो. देशपांडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग (विशेष).

प्रति,

महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
समादेशक, मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था होमगार्ड, घाटकोपर, मुंबई.
सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभाग (व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
गृह विभाग, पोयुजी-१, मंत्रालय, मुंबई-३२.
निवडनस्ती, विशा.८, गृह विभाग.